**पाली भूतवली लघु पाटबंधारे,**
**प्रकल्प ता.कर्जत ,जि.रायगड,**
**या योजनेस तृतीय सुधारीत**
**प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र. लपायो -२०२०/(प्र. क्र.११३/२०२०)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२२

**पहावे :-**

१) शासन निर्णय जलसंपदा विभाग, क्र. एसएव्ही/१०८१/(२३८६)जसंअ-२, दिनांक : १५.०७.१९८२
२) शासन निर्णय जलसपंदा विभाग क्र. लपायो -१२९३/(५१६/८३)/खारभूमी, दिनांक : ३०.१०.२००२
३) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोंपाविम-१४३/तां.५/२१९४ दिनांक:१२/०९/२००५
४) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोंपाविम/तां.४/ पाली भूतवली/११६८/२०२० दिनांक:०४/०५/२०२०
५) वित्त विभागाचे पत्र क्र.व्यअस-२०२१/ प्र.क्र.१७५ / अर्थ-२ दि.६ जानेवारी, २०२२

**प्रस्तावना:-**

पाली भूतवली लघु पाटंबधारे योजनेअंतर्गत मौजे भूतवली ता.कर्जत, जि. रायगड येथे १३.०७ दलघमी क्षमतेचे मातीचे धरण बांधण्यात आले आहे. हा प्रकल्प कोंकण पाटबंधारे विकास महामंडळाअंतर्गत " उर्वरित महाराष्ट्र " या प्रदेशामध्ये आहे. या प्रकल्पाद्वारे कर्जत तालुक्यातील २० गावातील एकूण ९५० हे. क्षेत्रास उघडा कालवा व बंदिस्त नलिकेद्वारे सिंचनाचा लाभ देणे नियोजित आहे.

सदर योजनेस संदर्भाधिन क्र.३ येथील दि.१२/०९/२००५ च्या कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचा निर्णय क्र. १४३ अन्वये प्रादेशिक दरसूची सन २००३-०४ नुसार रु. ३३९६.४१ लक्ष रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या सन २०१७-१८ च्यादरसुचीवर आधारीत रु. ९७६९.३१ लक्ष किंमतीच्या तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावाबाबत, राज्य तांत्रिक सल्लागार समिती.-२ (SLTAC-II) च्या दि. २५/०१/२०२० रोजी झालेल्या ३७ व्या बैठकीत छाननी अहवालातील १ ते २७ मुद्दे विचारात घेण्याच्या अधीन राहून, समितीकडून शिफारस करण्यात आली आहे. त्यानुषंगाने सदर्भ क्र.४ अन्वये कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्या कडून पाली भूतवली लघू पाटबंधारे प्रकल्प , ता.कर्जत ,जि.रायगड या योजनेचा तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

हा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या दि.१६.डिसेंबर,२०२१ च्या बैठकीत ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने सद्य:स्थिती, दरसूचीतील बदल, नवीन भूसंपादन कायदा, भूसंपादन खर्चात झालेली वाढ, संकल्पचित्रातील फेरबदल, गौण खनिज शुल्काच्या दरात झालेली सुधारणा इत्यादि किंमतवाढीची कारणमिमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन पाली भूतवली लघु पाटबधारे प्रकल्प, ता.कर्जत, जि. रायगड या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारित रु.९७६९.३१ लक्ष किंमतीस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून शासन पुढील आदेश निर्गमित करीत आहे.

**शासन निर्णय :-**

पाली भूतवली लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.कर्जत, जि. रायगड या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारित रु. ९७६९.३१ लक्ष( अक्षरी रुपये नऊ हजार सातशे एकोणसत्तर लक्ष एकतीस हजार फक्त ) किंमतीस [प्रत्यक्ष कामासाठी रु.८८९४.६० लक्ष व अनुषंगीक खर्च ८७४.७१ लक्ष] खालील अटींच्या अधीन राहून तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

२) "पाली भूतवली लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.कर्जत, जि. रायगड" या प्रकल्पाची तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय, अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्या वेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

३) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे याची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहील.

४) राज्य तांत्रीक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

५) तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहोचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.

६) संपूर्ण प्रकल्प हा तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च (१), सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारिक संदर्भ क्र.२०३/२०२१, दिनांक २५/११/२०२१ अन्वये तसेच वित्त विभागाच्या (कार्यासन व्यय-१२) अनौपचारिक संदर्भ क्र.४५१/२०२१, दिनांक १५/१२/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच दिनांक १६/१२/२०२१ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत **२२३** या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०२२०२१५१५०५३१०१२७** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अमोल फुंदे)
शासनाचे उप सचिव

सहपत्र :- परिशिष्ट "अ"

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
८. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.
९. जिल्हाधिकारी, रायगड
१०. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
११. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
१३. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१५. अधिक्षक अभियंता, उत्तर कोंकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा, ठाणे.
१६. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१७. खारभूमी कार्यासन/ कार्यासन लपा, (संग्रहार्थ) ....

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो -२०२०/(प्र. क्र.११३/२०२०)/खारभूमी, दिनांक: १५ फेब्रुवारी २०२२ चे परिशिष्ट)

**पाली भूतवली लघु पाटंबधारे . ता.कर्जत, जि. रायगड तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता उपशिर्षनिहाय तरतूदी**

| अ.क्र. | उपशिर्ष | तृतीय सुप्रमानुसार तरतुद (दरसूची सन २०१७-१८) रू. लक्ष |
|---|---|---|
| **अ) शिर्ष कामे** | | |
| १. | अे - प्राथमिक | ७.३६ |
| २. | बी - भूसंपादन | ७४८.६५ |
| ३. | सी -मुख्य कामे | |
| | अ) मुख्य धरण | १५३५.३८ |
| | ब) सांडवा कामे | १५४५.४४ |
| ४. | डी - विमोचक | ११०.४१ |
| ५. | के-इमारती | ८४.७० |
| ६. | एम-वृक्षारोपण | १४.२१ |
| ७. | ओ-संकीर्ण | ६४.५७ |
| ८. | पी-देखभाल दुरुस्ती | २३.९४ |
| ९. | आर-रस्ते | ४३.३५ |
| १० | स्वामित्व धन | १६०.७३ |
| | **एकूण शिर्षकामे (अ)** | **४३३६.१५** |
| **ब) कालवे व वितरण व्यवस्था** | | |
| १. | अे - प्राथमिक | २७.४० |
| २. | बी - भूसंपादन | १६५०.१७ |
| ३. | डी-विमोचक | ६८.३३ |
| ४. | एफ-मोरीकामे | ६०६.९२ |
| ५. | जी-पुल | २२८.३४ |
| ६. | एच-निकास | २.२५ |
| ७. | के-इमारती | ४२.७९ |
| ८. | एल मातीकाम/PDN | १८४०.४५ |
| ९. | एम-वृक्षलागवड | ८.५२ |
| १०. | ओ-संकीर्ण | ६.४१ |
| ११. | पी-देखभाल | ४.१२ |
| १२ | स्वामित्व धन | ७२.८८ |
| | **एकूण (ब)** | **४५५८.४५** |
| **एकूण कामे (अ+ब)** | | **८८९४.६०** |
| **क) अनुषंगीक खर्च** | | **८७४.७१** |
| **एकूण (अ+ब+क)** | | **९७६९.३१** |

**योजनेची ठळक वैशिष्टे :-**

| | | |
|---|---|---|
| १ | पाली भूतवली योजनेचे सिंचन क्षेत्र | ९५० हे. |
| २ | योजनेचा पाणीसाठा | १३.०७ द.ल.घ.मी |
| ३ | लाभव्यय गुणोत्तर | १.६६ (मापदंड १ पेक्षा अधिक मापदंडात बसते) |
| ४ | आर्थिक परतावा दर | ९.४४% ( मापदंड १२ % पेक्षा अधिक) योजना मापदंडात बसत नाही |
| ५ | पाणीसाठा किंमत | रू. ७४,७४६/- प्रति सघमी प्रचलित मापदंड रू १,७६,७२० पेक्षा कमी) योजना मापदंडात बसते. |

(अमोल फुंदे)

शासनाचे उप सचिव